






**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**मंत्रालय (विस्तार इमारत), दालन क्र.२६०,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मुंबई - ४०० ०३२.**

दूरध्वनी क्र.०२२-२२०२३१४१ E-mail ID : doadmin2.pwd@maharashtra.gov.in


---

क्रमांक:-एपीपी-११२१/प्र.क्र.२१०/प्रशा-२, दिनांक :- १५ नोव्हेंबर, २०२१.

## शासन आदेश

अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांचे अर्धशासकीय पत्र दिनांक १२.११.२०२१ अन्वये श्री. सदाशिव शंकरराव साळुंखे, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांची पदोन्नतीने पदस्थापना सचिव (रस्ते ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई या पदावर करण्यात आलेली आहे. श्री. सदाशिव शंकरराव साळुंखे यांना सचिव ( रस्ते ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई या पदाचा अतिरिक्त कार्यभार शासन आदेश क्र. पीएनएस-१७२१ / प्र. क्र. ३०१/ प्रशा-०२, दि.०१.११.२०२१ अन्वये सोपविण्यात आलेला होता. पदोन्नतीनंतर श्री. साळुंखे, यांनी सचिव ( रस्ते ) या पदाचा कार्यभार दिनांक १५-११-२०२१ (म.पू. ) पासून स्विकारला आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने व शासन मान्यतेने श्री. साळुंखे यांच्या पदोन्नती बाबत पुढील सविस्तर आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

२. श्री. सदाशिव शंकरराव साळुंखे, सचिव ( रस्ते ), यांना वेतन श्रेणी एस-३० मध्ये रु.१४४२००/- ते २१८२००/- या वेतन संरचनेत सचिव पदावर तदर्थ पदोन्नती दि.१५.११.२०२१ ( म. पू. ) पासून देण्यात येत आहे.

३. श्री. सदाशिव शंकरराव साळुंखे, सचिव ( रस्ते ), ( खुला प्रवर्ग ) यांची सचिव व सचिव समकक्ष पदासाठी तदर्थ पदोन्नती उपरोक्त नमूद केल्यानुसार आस्थापना मंडळाच्या शिफारशीनुसार व शासन मान्यतेने करण्यात येत आहे. श्री. सदाशिव शंकरराव साळुंखे यांची पदोन्नती ही सचिव व सचिव समकक्ष पदावरील पदोन्नती संदर्भात विविध न्यायालयात न्यायप्रविष्ट असलेल्या ज्येष्ठता सूची, मानीव दिनांक व पदोन्नती संदर्भातील प्रलंबित असलेल्या याचिका / मूळ अर्ज अशा न्यायालयीन प्रकरणांमधील अंतिम निर्णयाच्या (Original Applications, Court cases or orders having bearing on promotion) अधीन राहील.

४. सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात मा.सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२१११११५१७०८४८५६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार नावाने,

PRADEEP PUNAJI TIRLOTKAR

Digitally signed by PRADEEP PUNAJI TIRLOTKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ccd661813d437193c30b84b205e0a135838bd8252e5bad56d93fea8bfca55a9a, pseudonym=BDE95C233679ED9522D94A7AC04F7CE2EC7BC337, serialNumber=DB6B6957205113E4168ADAD8DB3AEB8B70CD1C42BD3EF06C1B5EB9D26A7BE37E, cn=PRADEEP PUNAJI TIRLOTKAR
Date: 2021.11.16 17:52:51 +05'30'

**( प्रदीप पु. तिर्लोटकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. सदाशिव शंकरराव साळुंखे, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे .

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम वगळून), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,
४. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून),यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,
६. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय
७. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा. मुख्य सचिवांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
१०. महालेखापाल -१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
११. महालेखापाल - २ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,नागपूर,
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१४. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली-११० ००१,
१५. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. उप सचिव व कार्यासन अधिकारी(का.९/का.९ अ/का. १०/का.१३/का. १६ ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,
१८. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई,
१९. सर्व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. अपर मुख्य सचिव (सा.बां.), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय
२१. अपर मुख्य सचिव (सेवा) , यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२. सचिव (साविस) , यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,

२३. सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. सचिव (बांधकामे), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
२६. सर्व मंत्रालयीन विभाग,
२७. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
२८. रोखशाखा (२ जादाप्रतीसह), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२९. निवड नस्ती.